**गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संस्था, पुणे. येथील लिपिक-टंकलेखक या अधिसंख्य पदास ११ महिने मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण -२०२१ /प्र.क्र.४७/विशि-५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २९ /०५/ २०२३.

<u>संदर्भ :-</u>

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. बीबीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि. २१ डिसेंबर, २०१९.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. बीबीसी-२०२०/प्र.क्र.१८७/१६-ब, दि. ३० जून, २०२०.
३) शासन निर्णय समक्रमांक दिनांक १३ जूलै, २०२१.
४) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २७ जून २०२२
५) संचालक, उच्च शिक्षण संचालनालय यांचे पत्र क्रमांक उशिसं/२०२३ / अधिसंख्य. पद / वि.शि.१/६२५८, दिनांक १६ मे, २०२३

<u>**प्रस्तावना :**</u>

संदर्भ क्र १ व २ येथील शासन निर्णयातील तरतूदी विचारात घेऊन, संदर्भ क्र,३ येथील शासन निर्णयान्वये गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संस्था, पुणे या अभिमत विद्यापीठातील अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्ती मिळवलेल्या तथापी, सदर प्रवर्गाची जात वैधता प्रमाणपत्र सादर करू न शकणाऱ्या कर्मचाऱ्यासाठी अधिसंख्य पद निर्माण करण्यात आलेले आहे.

संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयानुसार गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संस्था, पुणे येथील सेवा अधिसंख्य पदावरील लिपिक- टंकलेखक श्रीमती संध्या सध्या बारापात्रे यांची ११ महिन्याच्या कालावधीसाठी वर्ग केलेली मुदत दिनांक ५ जून २०२३ रोजी संपुष्टात येत असल्याने संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, पुणे यांनी सदर कर्मचारी यांच्या अधिसंख्य पदावरील सदर कालावधीस मुदतवाढ देण्याबाबत विनंती केलेली आहे. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, पुणे यांनी केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने सदर पदाला मुदत वाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आलेल्या गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संस्था, पुणे येथील अधिसंख्य पदावरील खालील नमूद कर्मचाऱ्याची सेवा वर्ग करण्यात आली आहे व ते सध्या ज्या पदावर कार्यरत आहेत अशा कर्मचाऱ्याची, अधिसंख्य पदावर वर्ग केलेली सेवा ज्या दिनांकापासून संपुष्टात आली आहे, त्या दिनांकापासून तात्पूरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरीता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त होतील / झाले असते, त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडले तोपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | सध्याचे पद | मूळ नियुक्तीचे पद | प्रथम नियुक्ती |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती संध्या बारापात्रे | लिपिक नि टंकलेखक | लिपिक नि टंकलेखक | दि. ०७/१०/२००३ |

२. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीबीसी-२०२०/ प्र.क्र.१८७/ अे / १६-ब, दि.३०/०६/२०२० नुसार विभागास प्राप्त अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५२९१५२५३७८९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.05.29 15:26:59 +05'30'

**( अ. म. बाविस्कर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल,मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अप्पर मुख्य सचिव सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
४. कुलगुरु, गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संस्था, पुणे
५. कुलसचिव, गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संस्था, पुणे
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ महाराष्ट्र, मुंबई,
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) १ महाराष्ट्र, मुंबई,
८. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण पुणे विभाग, पुणे,
१०. निवडनस्ती (विशि-५)